**राज्यातील खाजगी अनुदानित सैनिकी शाळांमध्ये शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांची भरती न करण्याबाबत व वैयक्तिक मान्यता न देण्याबाबत तसेच शैक्षणिक वर्ष सन २०२०-२१ पासून इयत्ता ५ वी ऐवजी ६वी पासून प्रवेश सुरु करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्र. इसैशा-२०२०/प्र.क्र.१७८(भाग-२)/एसएम-६**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- २४ एप्रिल, २०२०.

संदर्भ : १) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.इसैशा-१०९५/प्र.क्र.२७८/९५/माशि-८ दि.२६.०९.१९९५
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.इसैशा-१००१/प्र.क्र.१८५/२००१/माशि-७ दि.०५.०७.२००२
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.इसैशा-२००६/प्र.क्र.१२३/०७/माशि-७ दि.२४.१२.२००७

**शासन परिपत्रक : -**

राज्यात खाजगी अनुदानित सैनिकी शाळा सुरु करण्यास संदर्भ क्र.१ येथील २६.०९.१९९५ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली असून संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये इयत्ता ११ वी १२ वी च्या शास्त्र शाखा अभ्यासक्रमास तसेच संदर्भ क्र.३ येथील दि.२४.१२.२००७ च्या शासन निर्णयान्वये आदिवासी तुकडी सुरु करण्यास शासनाने मान्यता दिली आहे.

मा. मंत्रीमंडळाने राज्यातील खाजगी अनुदानित सैनिकी शाळांचे प्रचलित धोरण सुधारित करण्याबाबत निर्देश दिले असून या अनुषंगाने सैनिकी शाळांचे धोरण सुधारित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

राज्यातील खाजगी अनुदानित सैनिकी शाळांसंदर्भात सुधारित धोरण करण्याची कार्यवाही शासन स्तरावर सुरु असल्यामुळे यापरिपत्रकाच्या दिनांका पासून पुढील आदेश होईपर्यंत खाजगी अनुदानित सैनिकी शाळांमधील शिक्षक व शिक्षकेत्तर पदावर कोणत्याही उमेदवाराची नियुक्ती करण्यात येवू नये तसेच कोणत्याही पदास वैयक्तिक मान्यता देण्यात येवू नये.

बालकांना मोफत व शिक्षणाचा अधिकार अधिनियम २००९ मधील तरतुदींच्या अनुषंगाने शासन निर्णय दि.१३.०२.२०१३ अन्वये शिक्षणाची व्याख्या व त्याच्या स्तरामध्ये सुधारणा केली असुन इयत्ता १ ली ते इयत्ता ५ वी पर्यंत कनिष्ठ प्राथमिक, इयत्ता ६ वी ते ८ वी पर्यंत वरीष्ठ प्राथमिक व इयत्ता ९ वी ते १० वी पर्यंत माध्यमिक तसेच इयत्ता ११ वी ते १२ वी पर्यंत उच्च माध्यिमक शिक्षण असे संबोधण्याचा निर्णय घेतला आहे.

बालकांना मोफत व शिक्षणाचा अधिकार अधिनियम २००९ मधील तरतुदी व शासन निर्णय दि. १३.०२.२०१३ अन्वये घेतलेला निर्णय विचारात घेवून शैक्षणिक वर्ष सन २०२०-२१ मध्ये ५ वी वर्गात प्रवेश देवू नये. सन २०२१-२२ पासून राज्यातील खाजगी शासन अनुदानीत सैनिकी शाळांमध्ये इयत्ता ५ वी ऐवजी इयत्ता ६ वी मध्ये प्रवेश देण्यात यावे.

या निर्णयामुळे सन २०२०-२१ मध्ये इयत्ता ५ वी चा वर्ग बंद होणार असल्यामुळे अतिरिक्त ठरणाऱ्या शिक्षकांच्या समायोजनाबाबत स्वतंत्र्यपणे आदेश काढण्यात येतील तो पर्यंत संबंधित संस्थेने या शिक्षकांच्या सेवांचा वापर आवश्यकतेनुसार करावा. सदर शिक्षकांचे समायोजन होईपर्यंत शासनातर्फे देण्यात येणारे वेतन अनुदान पूर्वीप्रमाणे सुरु राहील.

वरील सूचनांचे सर्व संबंधितांनी काटेकोरपणे पालन करावे, या सुचनांचा भंग केल्यास त्याची गंभीर दखल घेण्यात येईल व संबंधिताविरुध्द नियमाप्रमाणे शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल, याची नोंद घ्यावी.

सदर शासन परिपत्रक शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावरुन उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक क्र. २०२००४२४१५३६५१५९२१ असा आहे. सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आले आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUSHIL
KHODWEKAR

Digitally signed by SUSHIL KHODWEKAR
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=1c4a8f0aafeac0a009d462f7f02d23942001d76225b9f704de267311
71c8684b, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=19b0ccbee5810aa5e36e9fa467a7630471d3c500ceb353fbb3
7bf0b6dfe0407a, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPT,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SUSHIL KHODWEKAR
Date: 2020.04.24 16:05:17 +05'30'

**( सुशिल खोडवेकर, भा. प्र. से. )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य , पुणे
२. शिक्षण संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक, पुणे
३. शिक्षण संचालक, प्राथमिक, पुणे
४. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
५. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद
६. सर्व शिक्षण अधिकारी (प्राथमिक/माध्यमिक)

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव
३. मा.उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव
४. मा मंत्री शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे खाजगी सचिव
५. मा. राज्यमंत्री शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे खाजगी सचिव
६. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक
८. सर्व सह सचिव/ उप सचिव शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९. निवड नस्ती (कार्यासन एसएम-६)